**राज्यस्तरीय नाविन्यपूर्ण योजना दुधाळ संकरित/देशी गाई/म्हशीचे गट वाटप अंमलबजावणीकरीता अनुसूचित जाती घटकांसाठी सन २०२१-२२ च्या अर्थसंकल्पित निधीतून बीडीएस प्रणालीवर निधी वितरित करणेबाबत.**
**लेखाशिर्ष २४०३डी ७२२**

# महाराष्ट्र शासन

**सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक :- बीजीटी-२०२२/प्र.क्र.१९/अर्थसंकल्प (विघयो)**
मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२,
दिनांक :- २१ मार्च, २०२२

वाचा :- १) शासन परिपत्रक, वित्त विभाग क्र.अर्थसं-२०२१/प्र.क्र.४८/अर्थ-३, दि. २८.१.२०२२ व दि.३.२.२०२२
२) कृषि व पदुम विभागाची नस्ती क्र.बीडीएस २०२१/प्र.क्र १०८/पदुम-४

**शासन निर्णय :-**

राज्यस्तरीय नाविन्यपूर्ण योजना दुधाळ संकरित/देशी गाई/म्हशीचे गट वाटप अंतर्गत सन २०२१-२२ करिता मागणी क्र. एन-३ लेखाशिर्ष २४०३डी ७२२, ३३- अर्थसहाय्य या लेखाशिर्षाखाली मूळ अर्थसंकल्पीय तरतूद रु. ८००.०० लाख असून सुधारीत अंदाजात रु.६००.०० लाख निधी उपलब्ध झाला आहे. त्यापैकी रु.२४०.०० लाख एवढा खर्ची झालेला निधी वजा जाता रु. ३६०.०० लाख इतकी तरतूद उपलब्ध आहे.

२. वित्त विभागाच्या संदर्भाधीन क्रमांक १. च्या परिपत्रकांन्वये राज्यात कोरोना विषाणूमुळे उद्भवलेली महामारीची परिस्थिती विचारात घेऊन निधी वितरणाकरीता शासनाने मार्गदर्शक सूचना निर्गमित केल्या आहेत.या अनुषंगाने कृषी व पदुम विभागाच्या संदर्भाधीन क्र. २ च्या नस्तीवर वित्त विभागाने दिलेल्या सहमतीस अनुसरुन सन २०२१-२२ मध्ये राज्यस्तरीय नाविन्यपूर्ण योजनेतंर्गत अनुसूचित प्रवर्गाकरीता ०६/०४/०२ दुधाळ संकरित/ देशी गाई/म्हशीचे गट वाटप करणे या योजनेच्या अंमलबजावणीसाठी सन २०२१-२२ आर्थिक वर्षाच्या अर्थसंकल्पीय निधीतून लेखाशिर्ष २४०३ डी ७२२ खाली उर्वरीत रु. ३६०.०० लाख इतका निधी प्रशासकीय विभाग प्रमुख म्हणून प्रधान सचिव (कृषी व पदुम) विभाग, मंत्रालय, मुंबई यांना अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीवर (BEAMS) वितरीत करण्यास मंजूरी प्रदान करण्यात येत आहे.

३. सदर निधी अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीवर वितरीत करण्यात आला आहे. सदर वितरीत निधी खर्च करतांना नियंत्रक अधिकारी यांनी विहित पध्दतीने काटकसरीच्या उपाययोजना करुन खर्च करावा. सध्याच्या शासकीय धोरणास अनुसरुन मंजूर आराखड्यानुसार याच वर्षात निधी खर्च होईल याची दक्षता घ्यावी. तसेच उपलब्ध करुन दिलेल्या तरतूदीतून झालेल्या खर्चाचा अहवाल, लेखाशिर्षनिहाय/ उपलेखाशिर्षनिहाय तसेच साध्य झालेले भौतिक उद्दिष्टनिहाय माहिती, निधी उपयोगिता प्रमाणपत्र, संबंधित क्षेत्रिय अधिकारी यांनी आयुक्त, समाजकल्याण, संबंधित प्रादेशिक उप आयुक्त, सामाजकल्याण, सामाजिकन्याय व विशेष सहाय्य विभाग व कृषी व पदुम विभाग यांना प्रत्येक महिन्याच्या १० तारखेपर्यंत पाठवणेबाबत दक्षता घ्यावी.

४. विभाग प्रमुख / नियंत्रक अधिकारी यांनी अनुसूचित जाती घटकांसाठीचा निधी त्याच घटकांवर खर्च होईल याची दक्षता घ्यावी, जेणेकरुन शासनाला या योजनांवर होणाऱ्या खर्चावर संनियंत्रण ठेवता येईल.

५. सदर शासन निर्णयान्वये वितरीत करण्यात आलेला निधी खर्च करतांना विभागप्रमुख तसेच नियंत्रक अधिकाऱ्यांनी महाराष्ट्र अर्थसंकल्प नियमपुस्तिका, वित्तीय अधिकार नियमपुस्तिका यामधील वित्तीय नियम तसेच वित्त विभागाच्या संदर्भाधीन दि. २८.१.२०२२ व दि. ३.२.२०२२ च्या शासन परिपत्रकातील दिलेल्या निर्देशांचे काटेकोरपणे पालन करावी.

६. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या संदर्भाधीन दि. २८.१.२०२२ व दि. ३.२.२०२२ रोजीच्या शासन परिपत्रकान्वये प्रशासकीय विभागास प्रदान केलेल्या अधिकारात आणि वित्त विभागाचा अनौपचारीक संदर्भ क्र. १८०/ व्यय-१४ दि. २५.०२.२०२२. अन्वये प्राप्त सहमतीस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलबध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२२०३२११७२८२२२०२२ असा आहे. सदर आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने.

Prashant Pundlik Wagh

Digitally signed by Prashant Pundlik Wagh
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Social Justice & Special Assist Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=759e87fbd1e68c290a7221620636ede8425d6a870aa0240f18d726b6c8e6b832, serialNumber=5599270e38b296e5e5d814ff5976561a3ec66d875aeb425d735e1d7c12140929, cn=Prashant Pundlik Wagh
Date: 2022.03.22 13:28:56 +05'30'

**( प्रशान्त पुं. वाघ)**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) प्रधान सचिव (कृषी), कृषी व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई
२) आयुक्त, कृषी, महाराष्ट्र राज्य
३) आयुक्त, समाजकल्याण, महाराष्ट्र राज्य, पुणे
४) सर्व प्रादेशिक उप आयुक्त (समाजकल्याण आयुक्तालयामार्फत)
५) ग्रंथपाल, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, ५वा मजला, विधानभवन, मुंबई
६) महालेखापाल (लेखापरिक्षा) / (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १/२, मुंबई/ नागपूर
७) वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
८) कृषी व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई
९) निवडनस्ती (अर्थसंकल्प/ विघयो), सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग